७ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक कार्यालयाच्या इमारत बांधकामाकरीता निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राछासे २०१८/प्र.क.२९/ क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ ऑगस्ट, २०२३

<u>वाचा :-</u> १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र. राछासे-२०१८/प्र.क.२९/क्रीयुसे-३, दि. २२ सप्टेंबर, २०२१

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र.राछासे-२०१८/प्र.क.२९/क्रीयुसे-३, दि. २१ डिसेंबर, २०२१

३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र.राछासे-२०१८/प्र.क.२९/क्रीयुसे-३, दि. ३० मार्च, २०२३

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३

५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. राछासे-इमारत व दुरूस्तीसाठी/२०२३-२४ /का-५/१९६८, दि. १९ जुलै, २०२३

**<u>प्रस्तावना :</u>**

७ महाराष्ट्र बटालीयन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक यांचे कार्यालय, सन १९५४ पासून कार्यान्वित असून सद्यस्थितीत ते एच.टि. पी. महाविद्यालय, नाशिक यांच्या इमारतीत भाडे तत्वावर सुरू आहे. सदरील कार्यालयासाठी उपलब्ध असलेल्या शासकीय जागेवर कार्यालयीन इमारतीच्या बांधकामासाठी सन २०२०-२१ च्या दरसुचीप्रमाणे रू. १०,७१,४४,३४२/- (अक्षरी रूपये दहा कोटी एकाहत्तर लक्ष चव्वेचाळीस हजार तीनशे बेचाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ व ३ अन्वये सदर कार्यालयाच्या इमारत बांधकामासाठी रू. ६.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

७ महाराष्ट्र बटालीयन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक येथील इमारतीच्या बांधकामाचे प्लास्टर, रंगकाम व इतर प्रलंबित कामासाठी उर्वरित रू. ४,७१,४४,३४२/- (अक्षरी रूपये चार कोटी, एकात्तर लक्ष, चौव्वेचाळीस हजार, तीनशे बेचाळीस फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

७ महाराष्ट्र बटालीयन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक यांच्या कार्यालयाच्या इमारतीच्या बांधकामाचे प्लास्टर, रंगकाम व इतर प्रलंबित कामासाठी उर्वरित रू. ४,७१,४४,३४२/- ( अक्षरी रूपये चार कोटी, एकात्तर लक्ष, चौव्वेचाळीस हजार, तीनशे बेचाळीस फक्त,) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील खर्च ०१ सर्वसाधारण शिक्षण-२०२ माध्यमिक शिक्षण (०४) शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३ मोठी बांधकामे ( ४२०२ ६२२८ )"या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, दि. १२.०४.२०२३ च्या शासन निर्णयातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीसंदर्भात समादेशक अधिकारी, ७ महाराष्ट्र बटालीयन, राष्ट्रीय छात्र सेना, नाशिक यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०८२९१४५२०३१७२१ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, pseudonym=D9E9BF2549554875691C6300C3F682524A1406B3, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2023.08.29 14:55:41 +05'30'

**( शैला ब. यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
५. महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
६. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नाशिक विभाग, नाशिक (संचालनालयामार्फत)
७. समादेशक अधिकारी, ७ महाराष्ट्र बटालियन,राष्ट्रीय छात्र सेना. नाशिक
८. वित्त विभाग (व्यय-५)/नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (क्रीयुसे- ३)